“निविदा मुल्यांकन समितीची (Tender Evaluation Committee) स्थापना करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ईएलआर-२०२१/प्र.क्र. ३१३/२१/३३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ मे, २०२२

**प्रस्तावना-**

भारत निवडणूक आयोगाच्या नियंत्रणाखाली महाराष्ट्र राज्यामध्ये लोकसभा/राज्यसभा आणि विधानसभा/ विधानपरिषद सभासदत्वासाठी सार्वत्रिक निवडणूकांचा तसेच पोट निवडणूकांचा कार्यक्रम पार पाडण्याची जबाबदारी मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचेवर सोपविण्यात आली आहे. या निवडणूक कार्यक्रमामध्ये “मतदार यादी” ही सर्वात महत्वाची बाब आहे. लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५० मधील तरतूदीनुसार ही यादी वेळोवेळी अद्ययावत करण्यात येत असते. यासाठी ई-निविदा प्रक्रियेचा अवलंब करून अभिकर्ता नेमण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

२. सदर निविदा प्रक्रिया राबवितांना ई-निविदा प्रक्रियेनुसार ज्या निविदा प्राप्त होतील त्या निविदांचे मुल्यांकन करण्यासाठी निविदा मुल्यांकन समितीची (Tender Evaluation Committee) स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

३. ई-निविदा प्रक्रियेनुसार ज्या निविदा प्राप्त होतील त्या निविदांचे मुल्यांकन करण्यासाठी खालील प्रमाणे निविदा मुल्यांकन समितीची (Tender Evaluation Committee) गठित करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी | - अध्यक्ष |
| उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी | - सदस्य |
| उप सचिव, वित्त विभाग | - सदस्य |
| उपसचिव, उद्योग विभाग/ उद्योग सह संचालक(भांख) | - सदस्य |
| संचालक, माहिती तंत्रज्ञान यांचे प्रतिनिधी | - सदस्य |
| अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी | - सदस्य सचिव |

४. सदर समितीने ई-निविदा प्रक्रियेद्वारे प्राप्त झालेल्या निविदांचे मुल्यांकन करून त्यापैकी निम्नतम (L-1) निविदेची निवड करून ती निविदा स्विकृतीसाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समितीच्या मान्यतेसाठी शिफारस करण्याची कार्यवाही करावयाची आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१७१६०७३९११०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHARAD VASANT DALVI

Digitally signed by SHARAD VASANT DALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=1399fb7e678462f739bedc2c75ad0bf8e1247bf370ffe8e27064723bdcfc9493, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A9C32A4E2910476B01439AF7ECE2EA41EF26B412DA906DF758C387D48C929583, cn=SHARAD VASANT DALVI
Date: 2022.05.17 16:10:20 +05'30'

**( शरद दळवी )**
अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,
महाराष्ट्र राज्य

**प्रत,**

१. अ.मु.स., वित्त विभाग/ उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
३. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय
४. मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक
५. उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक
६. निवडनस्ती.